पाणी टंचाई निवारणार्थ टंचाई कृती आराखडे तयार करण्यासाठी घेण्यात येणा-या ग्रामसभेच्या ठरावाची अट शिथील करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः टंचाई २०२०/प्र.क्र. १२९/पापु १४**
जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १९ ऑक्टोबर, २०२०

वाचा –

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई १००७/प्र.क्र. १९७/पापु १४, दिनांक २७.०२.२००८
२) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई१००८/प्र.क्र.१६८/पापु१४, दिनांक २४.१०.२००८
३) शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांक: ग्रापनि २०२०/प्र.क्र. २०/पंरा-२, दिनांक १२.०५.२०२०

प्रस्तावाना :-

राज्यात पिण्याच्या पाण्यांची संभाव्य टंचाई निर्माण होण्याची शक्यता लक्षात घेऊन जिल्हयात पिण्याच्या पाण्याची टंचाई भासण्याची शक्यता असलेल्या गावे/वाडयांसाठी पाणी टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत उपाययोजना घेण्यासाठी टंचाई निवारण कृती आराखडे तयार करणे, टंचाई घोषित करणे व उपाययोजनां राबविण्यासाठी ग्रामसभेच्या ठरावाची अट संदर्भ क्रमांक १ व २ च्या शासन निर्णयान्वये विहित केली आहे. सद्य:स्थितीत राज्यातील कोविड-१९ च्या संसर्गजन्य आजारामुळे असणारी आपत्कालीन स्थिती लक्षात घेता, ग्रामसभेमध्ये असणारी ग्रामस्थांची उपस्थिती आजाराच्या प्रादुभावाच्या दृष्टीने योग्य नाही, याकरिता ग्रामसभा घेण्यास पुढील आदेश होईपर्यंत तात्पुरत्या स्वरुपात स्थगिती ग्राम विकास विभागाच्या संदर्भ क्रमांक -०३ च्या परिपत्रकान्वये दिलेली आहे. सन २०२०-२१ चे पाणी टंचाई कृती आराखडे तयार करताना ग्रामसभेच्या ठरावाची अट शिथील करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती :-

शासन परिपत्रक:-

राज्यातील पिण्याच्या पाण्याची टंचाई निवारणासाठी टंचाई कालावधी सन २०२०-२१ करिता टंचाई कृती आराखडे तयार करण्याची, टंचाई घोषित करणे, त्यासंदर्भात अंमलबजावणी व तद्दनुषंगीक कार्यवाहीसाठी ग्रामसभेच्या ठरावाची अट पुढील आदेशापर्यंत शिथील करण्यात येत

आहे. ग्रामसभेच्या ठरावा ऐवजी ग्रामपंचायतीचा ठरावाआधारे पाणी टंचाई कृती आराखडे तयार करणे, घोषित करणे व तद्नुषंगिक कामांकरिता आवश्यक सहमती प्राप्त करावी.

टंचाई घोषित करणे व तद्नुषंगीक बाबी पुढील लगतच्या ग्रामसभेत नागरिकांच्या निदर्शनास आणण्यात याव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२०१०१९१४३६०३३९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh
Nivrutti
Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2020.10.19 15:27:34 +05'30'

**(गणेश पवार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
४) विभागीय आयुक्त (सर्व)
५) जिल्हाधिकारी (सर्व)
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
९) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१०) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
११) सह सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१२) पापु १४ (निवडनस्ती)